माहिती अधिकार अधिनियमातील तरतुदीची अधिक परिणामाकारक अंमलबजावणी होण्याच्या दृष्टीने आवश्यक त्या उपाय योजना त्वरीत करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
परिपत्रक क्र. माहिती-२०१०/प्र.क्र.१४५/आस्था-१२
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ८ जून, २०१०.

**परिपत्रक**

मा.राज्य माहिती आयोग खंडपीठ औरंगाबाद यांच्याकडे केंद्रीय माहितीचा अधिकार अधिनियम २००५ कलम १९(३) अन्वये दाखल झालेल्या अपिल क्र. ४८८/०९ च्या निर्णयामध्ये असे नमूद केले आहे की, "राज्य माहिती आयोगास अशा प्रकारच्या अनेक प्रकरणी असे आढळून आले आहे की, "ग्रामस्तरावर चाललेला कारभार पारदर्शक आणि समाधानकारक नाही. ग्रामपंचायतीच्या ग्रामसेवकावर गट विकास अधिकारी, पंचायत समिती यांचे कोणतेही नियंत्रण नाही. त्यांच्या कार्यालयाची विस्तार अधिकारी अथवा गट विकास अधिकारी पंचायत समिती यांच्याकडून नियमितपणे तपासणी होत नाही. काही प्रकरणी असेही निदर्शनास आले आहे की, ग्रामसेवक बदली झाल्यास त्याचा कारभार त्यांच्यानंतर रुजू होणा-या ग्रामसेवकास हस्तांतरीत न करता ग्रामपंचायतीचे सर्व अभिलेखे स्वतः बरोबर घेऊन जातो व कालांतराने ते नष्ट करतो वा हरवतो. अशा प्रकारे जी माहिती जनतेस माहिती अधिकार अधिनियमातील तरतुदीनुसार प्राप्त होणे अपेक्षित आहे ती उपलब्ध होण्यास अडचणी निर्माण होतात. औरंगाबाद महसुल क्षेत्रामध्ये एखाद दुसरा अपवाद वगळता माहिती अधिकार अधिनियमातील तरतदीनुसार अर्जदारास देय माहिती देखील देण्यासाठी सर्व ग्रामपंचायतीकडून टाळले जात आहे. सदर प्रकरणी ग्राम सेवकाने अर्जदारास माहिती न देण्याचे कारण म्हणजे त्यांच्या पूर्वीच्या ग्रामसेवकाने कार्यभार दिला नाही असे आहे. यावरुन जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी व त्यांच्या सर्व सहाय्यक अधिका-यांचे ग्रामसेवक या संवर्गातील कर्मचा-यांवर कोणतेही नियंत्रण असल्याचे आढळून आले नाही. त्यामुळे संबंधित ग्रामसेवकांस रु.२५०००/- ची शास्ती लावली आहे."

२. वरील प्रकरणाच्या अनुषंगाने माहिती अधिकार अधिनियम २००५मधील कलम १९(८) (क) (चार) च्या तरतुदीनुसार सर्व जिल्हा परिषदा व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयास मा.आयोगाने अशा सूचना दिल्या आहेत की, माहिती अधिकार अधिनियमातील तरतुदींची अधिक परिणामकारक अंमलबजावणी होण्याच्या दृष्टीने आणि स्थानिक स्वराज्य संस्थांचा कारभार अधिकाधिक लोकाभिमुख आणि पारदर्शक होण्यासाठी वर उल्लेख केलेल्या प्रकारांना आळा घालण्यासाठी उपाययोजना करुन याबाबतच्या सूचनांची तंतोतंत व काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

३. उपरोक्त सूचनांस अनुसरुन राज्यातील सर्व जिल्हा परिषदांतील मुख्याधिकारी यांना याद्वारे सूचना देण्यात येत आहेत की, माहिती अधिकार अधिनियमाची अंमलबजावणी होण्याच्या दृष्टीकोनातून मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी त्यांच्या अधिपत्याखालील सर्व संबंधित माहिती अधिकारी (ग्रामसेवकासह) यांना सक्त सूचना द्याव्यात. तसेच उक्त अधिनियमातील तरतूदीचे उल्लंघन करण्या-या अधिकारी/ कर्मचा-यांविरुध्द नियमाप्रमाणे आवश्यक ती कारवाई विनाविलंब करावी. याबाबत सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी नागरीकांना माहिती मिळण्यासाठी व स्थानिक स्वराज्य

संस्थांचा कारभार पारदर्शक होण्यासाठी विभागीय आयुक्त यांचे मार्गदर्शन घेवून त्यांचेकडे याबाबतचा अहवाल सादर करावा.

४. सदर परिपत्रक शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात येत असून त्याचा संकेतांक २०१००६०८१९३८३७००१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

(मोहम्मद हुसेन मुजावर)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति:-

विभागीय आयुक्त (सर्व)
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
कार्यासन आस्था-८, आस्था-९, आस्था-१०, आस्था-११ व समन्वय कक्ष यांना माहितीसाठी अग्रेषित.
निवड नस्ती, आस्था-१२.

F:C.R.145- 2010- 25.5.10.lwp